**आरटीई अंतर्गत २५ टक्के अंतर्गत शाळांमध्ये प्रवेश स्तरावर राखीव जागांवर प्रवेश देण्यात आलेल्या विद्यार्थ्यांच्या शैक्षणिक खर्च शुल्काची प्रतिपूर्तीचा दर ठरविणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः- आरटीई २०२३/प्र.क्र. १६/ एसडी-१**
मंत्रालय विस्तार इमारत, मुंबई ४०० ०३२.
दिनांकः- २१ फेब्रुवारी २०२५.

**वाचा :-**

१) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन परिपत्रक, क्र. आरटीई २०१८/ प्र.क्र. २४५/एसडी-१, दि.२१.०८.२०१९.

२) शासन निर्णय, क्रमांक, दि. २८.०२.२०२४.

**प्रस्तावना :-**

बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिकार अधिनियम २००९, मधील कलम १२ (१) (सी) नुसार खाजगी विनाअनुदानीत प्रवेश स्तरावर २५ टक्के जागा वंचित व दुर्बल घटकातील मुला/मुलींसाठी राखीव ठेवण्याची तरतूद आहे. बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाच्या अधिकार अधिनियम, २००९ मधील कलम १२ (२) नुसार आरटीई २५ टक्के प्रवेशीत विद्यार्थ्यांची शुल्क प्रतिपूर्ती शासनाने प्रतिवर्षी निश्चित केलेले दर व शाळांनी त्या-त्या वर्षी ठरविलेली फी यापैकी जे कमी असेल त्यानुसार संबंधित शाळांना करण्यात येते. त्यानुसार, शैक्षणिक वर्ष २०२४-२५ ह्या वर्षाचा शैक्षणिक शुल्क प्रतिपूर्तीचा दर निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचारधीन होती.

**शासन निर्णय :-**

बालकांचा मोफत व सक्तीचा शिक्षण हक्क अधिनियम २००९, कलम १२ (१) (सी) वंचित व दुर्बल घटकांतील बालकांना खाजगी विनाअनुदानीत स्वंयअर्थसहाय्यीत शाळांमध्ये उच्च प्राथमिक स्तरापर्यंत मोफत शिक्षण देण्यात येते.

२. त्यानुसार, शैक्षणिक वर्ष २०२४-२०२५ या वर्षाचा शैक्षणिक शुल्क प्रतिपूर्ती दर रु. १७,६७०/- प्रती विद्यार्थी करण्यास सदर शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

३. शैक्षणिक शुल्काची प्रतिपूर्ती करताना शासन परिपत्रक, दि. २१.०८.२०१९ नुसार खालील बाबीची पडताळणी करावी.

१) बालकांचा मोफत व सक्तीचा शिक्षणाचा अधिकार अधिनियम, २००९ कायद्यांतर्गत ज्या शाळांनी कमीत कमी २५% जागांवर वंचित व दुर्बल घटकांतील बालकांना प्रवेश दिले आहेत, अशा शाळांनी इयत्ता १ ली ते इयत्ता ८ वी च्या विद्यार्थ्यांसाठी आकारण्यात येणाऱ्या शैक्षणिक शुल्काचा तपशिल सरल या पोर्टलवर अथवा आरटीई पोर्टलवर जाहीर केलेला असावा. ज्या शाळांचे स्वतःचे संकेतस्थळ (Website) आहे, अशा शाळांनी शुल्काचा तपशिल संकेतस्थळावर देखील जाहीर केलेला असावा.

२) शाळेने शिक्षण हक्क अधिनियमांतर्गत आरटीई ची मान्यता प्राप्त असल्याबाबतचे प्रमाणपत्र सोबत जोडावे.

३) ज्या विद्यार्थ्यांना ऑनलाईन लॉटरी पध्दतीने यापूर्वी ज्या शाळेत प्रवेश मिळालेला आहे, असे विद्यार्थी संबंधित शाळेतच शिकत असल्याची खात्री सरल व आरटीई पोर्टलवरून करावी.

४) सर्व विद्यार्थ्यांचे आधारकार्ड सरल पोर्टलवर नोंदविलेले असावे. केवळ आधार नोंदणीकृत विद्यार्थ्यांची संख्या ग्राह्य धरावी तसेच प्रत्यक्ष विद्यार्थ्यांच्या संख्येपैकी फक्त २५% संख्या ही प्रतिपूर्ती साठी ग्राह्य धरण्यात येईल.

५) बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिकारी अधिनियम, २००९ मधील कलम-१२ (२) मधील परंतुकात नमूद केल्यानुसार कोणतीही जमीन, इमारत, साधन सामग्री किंवा इतर सुविधा मोफत किंवा सवलतीच्या दरात प्राप्त झाल्याच्या कारणावरून ज्या शाळांना विशिष्ट संख्येतील बालकांना मोफत शिक्षण देण्याची अट घालण्यात आली असेल, अशा शाळा, बालकांच्या विशिष्ट संख्येच्या मर्यादेपर्यत शैक्षणिक शुल्काच्या प्रतिपूर्तीसाठी हक्कदार असणार नाहीत.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०२२११५४८१३७७२१ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

TUSHAR VASANT MAHAJAN

Digitally signed by TUSHAR VASANT MAHAJAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=19c6c23f510a80926e9b7ee5db235979452f3f9e891811863 4069a6cc7a22b9f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1A39CEF3C157B9EE6A2ABE5779ACF233682613F7B9 C335D6BF4877267695CECA, cn=TUSHAR VASANT MAHAJAN
Date: 2025.02.21 15:49:15 +05'30'

**(तुषार महाजन)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव.
३. मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, यांचे सचिव, विधान भवन, मुंबई.
४. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, यांचे सचिव, विधान भवन, मुंबई.
५. मा.उप मुख्यमंत्री (१) यांचे प्रधान सचिव.
६. मा.उप मुख्यमंत्री (२) यांचे प्रधान सचिव.
७. मा. मंत्री (शालेय शिक्षण), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
८. मा. राज्यमंत्री (शालेय शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
९. सर्व मा. मंत्री/ मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१०. प्रधान सचिव, (शालेय शिक्षण व क्रीडा विभाग) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
११. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
१२. राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई.
१३. शिक्षण संचालक (प्राथमिक/ माध्यमिक), शिक्षण संचालनालय, पुणे.
१४. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १/२ मुंबई, नागपूर.
१५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२ मुंबई/नागपूर.
१६. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई-६३.
१७. सर्व वरिष्ठ लेखा परीक्षक (शिक्षण विभाग).
१८. अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
१९. सह सचिव/ उप सचिव (प्रशासन), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२०. वित्त विभाग, (व्यय-५/अर्थसंकल्प शाखा), मंत्रालय, मुंबई.
२१. अवर सचिव (अर्थसंकल्प), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२२. अवर सचिव/ कक्ष अधिकारी, लेखाशाखा, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२३. निवड नस्ती (एसडी-१).